प्रकल्पांतर्गत परदेश प्रशिक्षणास जाऊन
आलेल्या अधिका-यांची प्रकल्पाबाहेर
बदली न करण्याबाबत.

---

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक टिआरएन-११९५/प्र.क्र.१०८/९५/१२-अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १७ ऑक्टोबर, १९९५

परिपत्रक :-

विविध प्रकल्पांतर्गत संबंधित विषयाचे अधिक ज्ञान मिळावे यासाठी प्रकल्पाशी संबंधित काही अधिका-यांना परदेशी प्रशिक्षणासाठी पाठविले जाते. बहुतांशी प्रशिक्षणाचा खर्च प्रकल्पांतर्गत तरतुदीतून केला जातो. ओघानेच सदर प्रशिक्षणाचा लाभ त्याच प्रकल्पाकरिता मिळणे अपेक्षित असते. परंतु काही प्रकरणात असे निदर्शनास आले आहे की, प्रकल्पाच्या संबंधात प्रशिक्षण घेऊन आल्यानंतर अधिका-यांची प्रकल्पाच्या कामावरुन अन्यत्र बदली केली जाते. त्यामुळे ओघानेच प्रशिक्षणाद्वारे संपादिलेल्या ज्ञानाचा प्रकल्पास लाभ होत नाही. हे टाळण्याच्या दृष्टीने शासन असे आदेश देत आहे की, -

"एखाद्या प्रकल्पांतर्गत परदेश प्रशिक्षणासाठी अधिका-यांची शिफारस करतांना संबंधित विभागांनी अशाच अधिका-यांची शिफारस करावी की, ज्यांची किमान ३ वर्षांची शासकीय सेवा उपलब्ध आहे आणि प्रशिक्षणावरून परत आल्यानंतर बदलीच्या सर्वसाधारण मार्गदर्शक तत्वांच्या दृष्टीने ज्यांची पुढील १/१-½ वर्षांत संबंधित प्रकल्पाशी संबंधित पदावरून अन्यत्र बदली होण्याची शक्यता नाही."

वरील मार्गदर्शक तत्वे सर्व विभागांनी प्रशिक्षणासंबंधी प्रस्ताव हाताळतांना कटाक्षाने लक्षात घ्यावे व त्याची पूर्तता होत असल्याचे प्रत्येक प्रस्तावात विनिर्दिष्टपूर्व नमूद करावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[मनकुमार ...]
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
१] प्रशिक्षण समन्वयक, सर्व मंत्रालयीन विभाग,
२] मंत्रालयीन विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली असलेले सर्व विभाग प्रमुख